“उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपेनिर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटिका निर्मिती” या योजनेकरीता सन २०१५-१६ मध्ये निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. साववि-२०१५/प्र.क्र. ९१/ फ-११**
**मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२.**
**दिनांक - २१.०९.२०१५**

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय क्रमांकः अंदाज -२०१५/प्र.क्र.३६/फ-११, दि. १६ जून, २०१५ .
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१/प्र.क्र. ४७/१४-१५/१६७६/१५-१६, दि. ११/९/२०१५.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक-२०१५/प्र.क्र. १४०/अर्थसंकल्प-३, दि. ११ सप्टेंबर, २०१५.

**प्रस्तावना -**

जागतिक तापमानात होत असलेली वाढ (Global Warming), वातावरणातील बदल (Climatic Change), बदललेले निसर्ग आणि ऋतुचक्र, अनियमित पर्जन्यमान किंवा अतिवृष्टी किंवा दुष्काळ इत्यादी बाबींसंदर्भात गेल्या काही वर्षात निसर्ग आपल्याला कोणत्या ना कोणत्या माध्यमातून जाणीव करुन देत आहे. या सर्व बाबींवर मात करण्यासाठी त्यांची दाहकता कमी करणे हे आपल्या सर्वांच्या समोर मोठे आव्हान आहे. त्याकरिता मोठ्या प्रमाणात वृक्ष लागवड करणे आणि त्यातून हरित महाराष्ट्राची संकल्पना प्रत्यक्ष कृतीत उतरविण्यासाठी राज्य शासन कटिबध्द आहे.

राज्यामध्ये वन व वनेतर जमिनीवर वनक्षेत्र व वृक्षाच्छादन वाढवून त्यातून जैविक वैविध्येचे संरक्षण व संवर्धन करणे आवश्यक आहे. त्यासाठी उत्तम दर्जाची, गुणवत्तापूर्ण आणि उंच अशी रोपे आणि कलमे उपलब्ध होणे ही प्राथमिक गरज आहे. त्यानुषंगाने राज्यामध्ये उच्च तंत्रज्ञान वापरुन तालुका आणि महसूल विभाग स्तरावर रोपवाटिका निर्माण करणे नियोजित आहे. शासकीय आणि खाजगी संस्था / व्यक्ती यांच्याकडून वन आणि वनेतर जागेवर होणाऱ्या वृक्ष रोपनासाठी अशा रोपावाटिकांमधून वर नमूद केलेल्या रोपांची उपलब्धता होणे शक्य आहे. यासाठी “उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपेनिर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटिका निर्मिती” ही योजना राज्यात राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्याअनुषंगाने मा. मंत्रीमंडळाच्या मान्यतेनंतर संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयाद्वारे सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात या योजनेची अंमलबजावणी करण्यास शासनाने मान्यता दिली आहे.

वर नमूद योजनेतंर्गत प्रस्तावित कामे आणि आधुनिक तंत्रज्ञानाव्दारे रोप निर्मितीसाठी सुविधा निर्माण करणे यासंदर्भातील स्वरुप आणि उद्दीष्टे ही सध्या अस्तित्वात असलेल्या “ डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय मध्यवर्ती रोपवाटिकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण ” या योजनेशी जवळपास सारखी आहेत. त्यानुसार सदर योजना वन विभागामध्ये सध्या सुरु असलेल्या “ डॉ. बाबासाहेब आंबे्डकर शासकीय मध्यवर्ती रोपवाटिकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण ” या योजनेमध्ये समाविष्ट करण्यास आणि या योजनेसाठी मंजूर असलेला नियतव्यय त्या लेखाशिर्षांतर्गत वळती करण्यास संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

या योजनेतंर्गत हाती घ्यावयाच्या कामासंदर्भात महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांनी रोपवाटिका निर्मिती संदर्भातील स्थळनिश्चिती केली असून, प्रचलित मापदंडानुसार सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात आले असल्याचे महासंचालक, सामाजिक वनीकरण विभाग यांनी संदर्भ क्र. २ येथे नमूद पत्रान्वये कळविले आहे. त्याचबरोबर या योजनेतंर्गत हाती घ्यावयाच्या कामांच्या अनुषंगाने तयार करण्यात आलेल्या प्रत्येक सविस्तर अंदाजपत्रक आणि नकाशे यास सक्षम प्राधिकाऱ्यांने तांत्रिक मंजूरी आणि प्रशासकीय मान्यता दिली असल्याचे देखील महासंचालकांनी कळविले आहे. त्यानुसार या योजनेस सन २०१५-१६ मध्ये निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणा-या " डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय मध्यवर्ती रोपवाटिकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण " या योजनेकरिता रु.१८७०.०० लक्ष इतका निधी जुलै, २०१५ मधील पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यास मंजुरी देण्यात आली आहे. सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. वितरित करावयाच्या निधीसंदर्भातील माहे सप्टेंबर, २०१५ ते मार्च, २०१६ मधील कॅश फ्लो बाबतचे **विवरणपत्र- १** सोबत जोडले आहे.

२. सदर निधी साठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक,सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेतंर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

३. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मार्फत व्हावे.

४. सदर योजनेतंर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ मध्ये मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र.सी-७, वनीकरण व वन्यजीवन,-राज्य योजनांतर्गत योजना, १०२ सामाजिक व क्षेत्रीय वनीकरण,(०१) वनरोपण व मृदा आर्द्रता आणि मृदसंधारण (०३)(०४) डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय मध्यवर्ती रोपवाटिकांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण (२४०६ ८६१३) -५० इतर खर्च " उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपेनिर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटिका निर्मिती ".

५. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. ३ येथे नमूद वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पूरक-२०१५/ प्र.क्र. १४०/अर्थसंकल्प-३ दि. ११ सप्टेंबर, २०१५ मधील सूचनांनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२११५२१२१५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.09.21 15:25:39 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
सह सचिव, (वने)

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग.
५. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय
६. सचिव, (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय.
७. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग.
८. सचिव (वने), महसूल व वन विभाग.
९. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१०.प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख ),नागपूर.
११.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
१४. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
१५. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
१८. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१९. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प- ०६ मंत्रालय, मुंबई-३२
२०. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२.सह सचिव/उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३. निवडनस्ती/फ-११.

## विवरणपत्र - १

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. साववि-२०१५/प्र.क्र. ९१/ फ-११, दिनांक २१.०९.२०१५**

योजनेचे नांव - उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपेनिर्मितीसाठी जिल्हास्तरावर व तालुकास्तरावर रोपवाटिका निर्मिती

(रु.लाखात)

| सविस्तर शीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | सप्टेंबर, २०१५ | ऑक्टोबर, २०१५ | नोव्हेंबर, २०१५ | डिसेंबर, २०१५ | जानेवारी, २०१६ | फेब्रुवारी, २०१६ | मार्च, २०१६ | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५०-इतर खर्च | १८७०.०० | ०.०० | १७५.०० | ७४८.०० | ५७३.०० | ३७४.०० | ०.०० | ०.०० | १८७०.०० |
| एकूण | १८७०.०० | ०.०० | १७५.०० | ७४८.०० | ५७३.०० | ३७४.०० | ०.०० | ०.०० | १८७०.०० |

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.09.21 15:25:56 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
सह सचिव, (वने)